**जलसंपदा विभागामध्ये नाविन्यपूर्ण तंत्रज्ञानाचा अवलंब.**

Introjected Backfill Retaining Walls with Easy Horizontal Platforms तंत्रज्ञानाचा वापर

# महाराष्ट्र शासन

**जलसंपदा विभाग**

**परिपत्रक क्र.संकीर्ण २०२२/प्र.क्र.०३/जसं (धोरण)**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १८.०७.२०२३.

**संदर्भ :** नाविन्यपूर्ण तंत्रज्ञानाची स्वीकारार्हतेबाबत शिफारस करणेसाठी गठीत शक्ती प्रदत्त समितीच्या दि.२३.११.२०२१ रोजीच्या सातव्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रास्ताविक :-**

जलसंपदा विभागामध्ये नाविन्यपूर्ण तंत्रज्ञानाच्या वापरास प्रोत्साहन देण्यासाठी दि.२७.०५.२०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये Technology Approval Mechanism गठीत करण्यात आला असून, सदर शासन निर्णयातील मुद्दा क्र.२ नुसार दि.२८.११.२०१६ च्या शासन निर्णयान्वये नाविन्यपूर्ण तंत्रज्ञानाच्या स्वीकारार्हतेबाबत शिफारस करणेसाठी शक्ती प्रदत्त समितीचे गठण करण्यात आले आहे. सदर समिती नाविन्यपूर्ण तंत्रज्ञान, बांधकाम साहित्य, यंत्रसामुग्री, प्रकल्प संकल्पन व आराखडा, बांधकाम पध्दती यांचा जलसंपदा विभागातील विविध प्रकल्प घटकांसाठी अवलंब करण्यासाठी आवश्यक आर्थिक व तांत्रिक व्यवहार्यता तपासून शासनास शिफारस करते व त्यावर शासन स्तरावर पुढील कार्यवाही बाबत निर्देश देण्यात येतात.

**Introjected Backfill Retaining Walls with Easy Horizontal Platforms तंत्रज्ञान व त्याची उपयुक्तता:-**

१. सदर तंत्रज्ञानामध्ये Retaining Walls च्या संकल्पनेमध्ये Horizontal Platforms प्रस्तावित करण्यात आलेले असून, त्यामुळे Retaining Walls ची स्थैर्यता वाढविण्यास मदत होते व Conventional Retaining Walls च्या तुलनेने त्यांचे आकारमान कमी लागते पर्यायाने सर्वसाधारणपणे बांधकामाच्या खर्चामध्ये १५% पर्यंत बचत होऊ शकते.

२. ज्या ठिकाणी Retaining Walls साठी कमी क्षेत्र उपलब्ध आहे त्या ठिकाणी, अतिरिक्त जागा संपादीत करण्याची आवश्यकता नाही. त्यामुळे उपलब्ध जागेच्या मर्यादेत कमी उत्खनन करुन सदर Walls ची उभारणी शक्य आहे तसेच यामुळे cutting व backfilling च्या खर्चात बचत होते.

३. इतर तंत्रज्ञानाच्या तुलनेत सदर प्रकारच्या Retaining Walls बांधकामासाठी कमी कालावधी लागतो.

४. सदर Wall च्या संकल्पनानुसार, Weep holes व filters ची तरतूद असल्याने, पावसाळ्यात बांधकाम करावयाचे असल्यास, पाणी पृष्ठभागावरुन व्यवस्थितपणे वाहू शकते व Wall च्या स्थैर्यावर विपरित परिणाम होत नाही.

५. या तंत्रज्ञानानुसार बांधकाम केलेल्या भिंती Static आणि Seismic स्थितीमध्ये स्थिर असतात. सदरच्या तंत्रज्ञानामुळे Rock fall टाळला जातो. तसेच या तंत्रज्ञानाद्वारे बांधलेल्या भिंतींचे आयुष्यमान सर्वसाधारणपणे RCC Retaining Walls इतकेच आहे.

**समितीची शिफारस :-**

नाविन्यपूर्ण तंत्रज्ञानाच्या स्वीकारार्हतेबाबत शक्ती प्रदत्त समितीच्या सातव्या बैठकीत " Introjected Backfill Retaining Walls with Easy Horizontal Platforms" या तंत्रज्ञानाबाबत समितीने, सदर तंत्रज्ञानाचा वापर हा सर्वसाधारणपणे सहा मीटर पेक्षा उंच असलेल्या Retaining walls मध्ये उपयुक्त वाटतो. सदर तंत्रज्ञानाचा वापर करणेपूर्वी प्रवर्तकाने Retaining walls चे संकल्पन हे मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना, नाशिक यांचेकडून तपासणी करुन घेणे आवश्यक आहे, अशी शिफारस करण्यात आलेली आहे.

नाविन्यपूर्ण तंत्रज्ञान स्वीकारण्यासाठीच्या गठित शक्ती प्रदत्त समितीच्या शिफारसीनुसार खालीलप्रमाणे सूचना निर्गमित करण्यात येत आहेत :

**परिपत्रक :-**

"Introjected Backfill Retaining Walls with Easy Horizontal Platforms"

१. या तंत्रज्ञानाचा वापर सहा मीटर पेक्षा उंच असलेल्या पक्षभिंतीमध्ये क्षेत्रिय मुख्य अभियंता यांच्या सहमतीने करण्यात यावा.

२. सदरचे तंत्रज्ञान हे Patented असल्याने Patent ची व्याप्ती व कायदेशीर (legal) बाबी क्षेत्रिय अभियंत्यानी अभ्यासून तंत्रज्ञान वापराबाबत निर्णय घ्यावा.

३. सदरचे तंत्रज्ञान वापरापूर्वी मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना, नाशिक मधील संबधित मंडळाद्वारे संकल्पनाची तपासणी/मुल्यार्पण करण्यात यावे.

सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्यांचा संकेताक २०२३०७१८१५१७३९६६२७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

AMRUTA AJIT INAMDAR

Digitally signed by AMRUTA AJIT INAMDAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=970a1595c1174195bb66e7d7e826528118408f913b99e85fc47d3c5d3d5366de, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6F5FD13E252931098539336E1E4B5ACCE5E7F01F9C3FEABD54FBD95FAC86E18F, cn=AMRUTA AJIT INAMDAR
Date: 2023.07.18 15:19:25 +05'30'

( अ.अ. इनामदार )
**शासनाच्या अवर सचिव**

**प्रत:-**

१. स्वीय सहायक, प्रधान सचिव,(जलसंपदा), मंत्रालय,मुंबई,

२. स्वीय सहायक, सचिव (लाक्षेवि),जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
३. स्वीय सहायक, सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
४. महासंचालक, मेरी, नाशिक,
५. सर्व कार्यकारी संचालक, पाटबंधारे महामंडळे, जलसंपदा विभाग.
६. स्वीय सहायक, सर्व मुख्य अभियंता व सह सचिव,जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. मुख्य अभियंता, मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना, नाशिक
९. सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग यांना कार्यवाहीसाठी.
सदरचे परिपत्रक आपल्या अधिपत्याखालील संबंधीत सर्व अधिक्षक अभियंता, कार्यकारी अभियंता यांच्या निदर्शनास आणावे.
१०.सर्व उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई.
११.जसं (धोरण) संग्रहार्थ.